केंद्र पुरस्कृत मिशन शक्ती या कार्यक्रमांतर्गत अंतर्गत पाळणा (Anganwadi cum creche) या योजनेकरिता निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०२५/प्र.क्र.१०/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २४ मार्च,२०२५

**संदर्भ:-** १) महिला व बाल विकास मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. Palna ०५/०४/२०२३- Palna दि. १०.०८.२०२३

२) महिला व बाल विकास मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. Palna /८/२०२४-Mission Shakti दि. २९.०२.२०२४

३) महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्रमांक एबावि-२०२२/प्र.क्र.२२/का.६, दि. १३.१०.२०२४

४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. १७.०३.२०२५

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार मिशन शक्ती मधील "सामर्थ्य" या कार्यक्रमांतर्गत राज्यात पाळणा (Anganwadi cum creche) ही योजना सुरु करण्यास संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुषंगाने पाळणा (Anganwadi cum creche) या योजने अंतर्गत केंद्र शासनाने सद्यस्थितीत दिलेल्या मान्यतेनुसार राज्यात ३४५ पाळणा (Anganwadi cum creche) सुरू करण्यास तसेच केंद्र शासनाकडून यापुढे जस जशी मंजुरी देण्यात येईल त्याप्रमाणे पाळणा (Anganwadi cum creche) सुरु करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेकरिता केंद्र व राज्य हिश्याचे प्रमाण ६०:४० असे आहे.

केंद्र शासनाने सद्यस्थितीत राज्यात ३४५ पाळणा (Anganwadi cum creche) सुरू करण्यास मान्यता देऊन त्याकरिताच्या अनावर्ती खर्च व आवर्ती खर्चाच्या एका तिमाहीकरिताचा त्यांच्या हिश्याचा निधी संदर्भाधीन क्र. २ येथील आदेशान्वये उपलब्ध करून दिलेला आहे. त्यानुषंगाने प्राप्त केंद्र हिश्यास अनुसरून तरतूद वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मिशन शक्ती मधील "सामर्थ्य" या कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाने मान्यता दिल्यानुसार राज्यात ३४५ पाळणा (Anganwadi cum creche) कार्यान्वित करण्यास खालीलप्रमाणे रकाना क्र. २ येथील लेखाशीर्ष / उद्दिष्टामधून रकाना क्र. ५ येथे नमूद केल्यानुसार एकूण रुपये ३.८६९३ कोटी (अक्षरी रुपये तीन कोटी शहाऐंशी लाख त्र्यान्नव हजार फ़क्त) एवढी तरतूद आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांना वितरीत व खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| अं.क्र. | लेखाशीर्ष / उद्दिष्ट / संगणक सांकेतांक | विद्यमान तरतूद २०२४-२५ | यापूर्वी वितरीत तरतूद | या आदेशान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | मागणी क्र. एक्स ०१<br>२२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण<br>०२-समाज कल्याण, १०३- महिला कल्याण<br>(३२) "मिशन शक्ती" या एकछत्री योजने अंतर्गत "सामर्थ्य" उपयोजना<br>(३२) (०३) "पाळणा" (अंगणवाडी कम क्रेच) (कार्यक्रम) (केंद्र हिस्सा ६० टक्के)<br>**२२३५ डी ६८७,** ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) | २३२.१६ | ०.०० | २३२.१६ |
| २. | (३२) (०४) "पाळणा" (अंगणवाडी कम क्रेच) (कार्यक्रम) (राज्य हिस्सा ४० टक्के)<br>**२२३५ डी ६९६**, ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) | १५४.७७ | ०.०० | १५४.७७ |
| | **एकूण** | **३८६.९३** | ०.०० | **३८६.९३** |

२. केंद्र शासनाने तसेच राज्य शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करून सदर निधी उपयोजनात आणण्याची कार्यवाही आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी करावी.

३. केंद्र शासनाने विहित केलेल्या वित्तीय निकषांनुसार राज्यात ३४५ पाळणा (Anganwadi cum creche) कार्यान्वित करण्याची कार्यवाही आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी करावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि. १७.०३.२०२५ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३२४१५५३०८४९३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2025.03.24 17:53:23 +05'30'

**(वि. रा. ठाकूर)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता),(लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,

२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई,

३) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,

४) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी (म.व बा.वि.),जिल्हा परिषद,

५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

६) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,

७) निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई,

८) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का.१४७२) / वित्त विभाग (व्यय-६), मंत्रालय, मुंबई,

९) कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,

१०) निवड नस्ती -का-६.